**दहशतवाद विरोधी पथक, मुंबई कार्यालयातील पोलीस उप आयुक्त (माहिती व विश्लेषण कक्ष) व पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन) या दोन पदांचे विलीनीकरण करुन पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष) असे एकच पद निर्माण करणे व उर्वरीत पोलीस उप आयुक्ताचे पद पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे या पदामध्ये रुपांतरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपीओ-३६१६/प्र.क्र.१२८/पोल-३**

मंत्रालय, दुसरा मजला, मुख्य इमारत,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई
दिनांक : २२ डिसेंबर, २०१६

वाचा :-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्र.एसएसए-१०/०३/१५/विशा-४, दि.०८.०७.२००४
२) गृह विभाग, शासन निर्णय क्र.आयएसएस-१००९/प्र.क्र.६०/विशा-४, दि.२७.०७.२००९
३) गृह विभाग, शासन निर्णय क्र.रापोसे-१३०८/प्र.क्र.२२८/पोल-१अ, दि.२२.१०.२००९
४) वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५
५) अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.१४५१/अपोमसं/दविप/कोष/२०१६, दि.३०.०६.२०१६
६) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.पोमसं/२६-ब/दविप/ पो.अ.पुणे/ रुपातंर/४८/२०१६, दि.०७.०७.२०१६

प्रस्तावना :-

वित्त विभागाने उपरोक्त संदर्भाधिन क्र.०४ येथील नमूद दिनांक ०२.०६.२०१५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागाला प्रशासनावर कोणताही विपरीत परिणाम न होता, विभागामध्ये एकुण उपलब्ध कर्मचाऱ्याचे समायोजन करण्याचे संपुर्ण अधिकार राहतील. विभागाच्या ज्या संवर्गाच्या बाबतीत कामांची आवश्यकता कमी झाली आहे, अशा संवर्गातील पदांची विभागातील तीच वेतनश्रेणी असलेल्या दुसऱ्या संवर्गात आवश्यकतेनुसार पदे स्थानांतरण करण्यात येतील. तथापि त्या विभागातंर्गत एकुण पद संख्येच्या मर्यादेतच असे समायोजन राहील, अशी तरतुद केली आहे. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्र.०६ येथे नमूद दिनांक ०७.०७.२०१६ च्या पत्रान्वये राज्यातील दहशवादी कारवायामध्ये होत असलेली वाढ, ठिकठिकाणी सापडत असलेली स्फोटके व शस्त्रास्त्रे इ. बाबींना परिणामकारक आळा

घालण्यासाठी दहशतवाद विरोधी पथकांच्या कार्यकक्षा वाढवून हि यंत्रणा अधिक मजबूत व कार्यक्षम बनविण्यासाठी दहशतवाद विरोधी पथक, मुंबई कार्यालयातील पोलीस उप आयुक्त (माहिती विश्लेषण कक्ष) व पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन) या दोन पदांचे विलीनीकरण करुन पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष) असे एकच पद निर्माण करण्याची व उर्वरीत पद पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे या पदामध्ये रुपांतरीत करण्याबाबत शासनास विनंती केली आहे. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी उपरोक्त प्रमाणे केलेली विनंती व वित्त विभागाच्या तरतुदीनुसार दहशतवाद विरोधी पथक, मुंबई कार्यालयातील पोलीस उप आयुक्त (माहिती विश्लेषण कक्ष) व पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन कक्ष) या दोन पदांचे विलीनीकरण करुन पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष) असे एकच पद निर्माण करण्याची व उर्वरीत राहणारे पोलीस उप आयुक्ताचे पद हे पोलीस अधीक्षक या पदामध्ये रुपातंरीत करुन ते दहशतवाद विरोधी पथक, पुणे युनीटकरीता स्थानांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे

**<u>शासन निर्णय :-</u>**

अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, मुंबई यांच्या आस्थापनेवरील पोलीस उप आयुक्त (माहिती विश्लेषण कक्ष) यांच्या कडील माहिती विश्लेषण कक्षाचा कार्यभार कायमस्वरुपी पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन कक्ष) यांच्याकडे वर्ग करण्यास व पदभार मुक्त झाल्यामुळे उर्वरीत राहणारे पोलीस उप आयुक्ताचे पद हे पोलीस अधीक्षक या पदामध्ये रुपातंरीत करुन ते दहशतवाद विरोधी पथक, पुणे युनीटकरीता स्थानांतरण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. पोलीस उप आयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन कक्ष) यांच्याकडे माहिती विश्लेषण कक्षाचा कायमस्वरुपी पदभार आल्यामुळे सदर पदाचे पदनाम पोलीस उपआयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष) याप्रमाणे राहील.

३. पोलीस उपआयुक्त (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष), पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, औरंगाबाद युनीट व पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे युनीट यांचे कार्यक्षेत्र खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार राहील.

| अ.क्र. | पोलीस उप आयुक्त / पोलीस अधीक्षक | कार्यक्षेत्र |
|---|---|---|
| १. | पोलीस उपआयुक्त, (तांत्रिक माहिती संशोधन व माहिती विश्लेषण कक्ष), | तांत्रिक संशोधन कक्ष व सायबर विभागाचे कामकाजावर देखरेख करणे, व्हीडीओ/फोटो ॲनॅलिसीस व संवर्धन, सायबर मॉनीटरींग, ध्वनी, दळणवळण यंत्रणा, मोबाईल फोन, न्यायवैद्यक तपासणी |

| | | |
|---|---|---|
| | दहशतवाद विरोधी पथक, मुंबई. | इत्यादी बाबी संबंधीच्या तांत्रिक, सुविधा या कक्षामार्फत पुरविण्यात येतील तसेच दहशतवादी गटांच्या व तत्सम कारवायांना आर्थिक मदत पुरविण्यासाठी बनावट नोटा आणि दहशतवाद कारवायांशी संबंधीत हवाला व्यवहार इत्यादींचे नेटवर्क चालविणाऱ्या व्यक्तींच्या हालचालींवर लक्ष ठेवणे.<br>माहिती विश्लेषण कक्षाचे कामकाजावर देखरेख करणे, मिळालेल्या गुप्त माहितीचे संकलन करणे, अभ्यास व विश्लेषण करणे, सदर माहितीचा डेटाबेस तयार करणे तसेच देशभरात घडणाऱ्या विविध संघटनांची माहिती मिळवुन त्याचा डेटाबेस तयार करणे. |
| २. | पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, औरंगाबाद. | औरंगाबाद पोलीस आयुक्तालय, औरंगाबाद परिक्षेत्र, नांदेड परिक्षेत्र, अमरावती पोलीस आयुक्तालय, अमरावती परिक्षेत्र, नागपूर पोलीस आयुक्तालय, नागपूर परिक्षेत्र. |
| ३. | पोलीस अधीक्षक, दहशतवाद विरोधी पथक, पुणे. | पुणे पोलीस आयुक्तालय, कोल्हापूर परिक्षेत्र, सोलापुर पोलीस आयुक्तालय, नाशिक पोलीस आयुक्तालय व नाशिक परिक्षेत्र. |

४. सदर शासन निर्णय वित्त विभाग शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१५/प्र.क्र.४१/अर्थ-१, दि.०२.०६.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२२१६२५२५३५२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dhiraj K Abhang

Digitally signed by Dhiraj K Abhang
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b83edfcbaa0fddb5983e8303bccd9a96ef7cc55853b8b449ff8dc53d69f1618d, cn=Dhiraj K Abhang
Date: 2016.12.22 16:28:24 +05'30'

**(धीरज कां. अभंग)**
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
२. मा.राज्यमंत्री,गृह (शहरे) यांचे खाजगी सचिव.

३. मा.राज्यमंत्री,गृह(ग्रामीण) यांचे खाजगी सचिव.
४. अपर मुख्य सचिव (गृह), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. प्रधान सचिव (विशेष), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. पोलीस आयुक्त,बृहन्मुंबई.
८. पोलीस आयुक्त,राज्य गुप्तवार्ता विभाग.
९. अपर पोलीस महासंचालक, दहशतवाद विरोधी पथक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०.पोलीस उपआयुक्त, दहशतवाद विरोधी पथक, औरंगाबाद.
११.अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई.
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई/पुणे.
१३.निवासी लेखा परीक्षा अधिकारी,वांद्रे,मुंबई.
१४.वित्त विभाग (व्यय-७)/वित्तिय सुधारणा-१.
१५.निवड नस्ती, पोल-३.